**राज्य मुख्य माहिती आयुक्त यांच्या सेवा शर्तीमध्ये सुधारणा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण२०१७/प्र.क्र.१२६/कार्या-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १८ जानेवारी, २०१९

वाचा:- (१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआयसी-२००६ /१३२२/ सीआर ०४/०७/५, दिनांक ७ सप्टेंबर, २००७
(२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक रामाआ२०१०/ ५३९/ प्र.क्र.१०/ सहा, दिनांक ८ फेब्रुवारी, २०११
(३) High Court & Supreme Court Judges (Salaries & conditions of Service, Amendment Act, २०१८ दिनांक २७ जानेवारी, २०१८
(४) केंद्रीय माहिती आयोगाचे आदेश क्रमांक ३४/२/२०१५/सीआयसी/ॲडमीन, दिनांक ५ जुलै, २०१८

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाने High Court and Supreme Court Judges (Salaries and Conditions of Service) Amendment Act,२०१८, दिनांक २७ जानेवारी, २०१८ अन्वये केलेल्या सुधारणा विचारात घेऊन भारताच्या निवडणुक आयुक्तांच्या सेवेच्या अटी व शर्तीमध्ये सुधारणा केल्या आहेत. त्यानुसार केंद्रीय मुख्य माहिती आयुक्त व माहिती आयुक्त यांच्या सेवेच्या अटी व शर्तीमध्ये व सेवा निवृत्तीविषयक लाभामध्ये केंद्रीय माहिती आयोगाचे संदर्भ क्र.४ येथील दिनांक ५ जुलै, २०१८ च्या आदेशान्वये सुधारणा केली आहे. सदर सुधारणा दिनांक १ जानेवारी, २०१६ पासून अंमलात आल्या आहेत.

२. माहितीचा अधिकार अधिनियम, २००५ च्या कलम १६ (५) अन्वये राज्य मुख्य माहिती आयुक्त यांचे वेतन व भत्ते आणि सेवेच्या इतर अटी व शर्ती, भारताचे निवडणुक आयुक्तांप्रमाणे असतील अशी तरतुद आहे. त्यानुसार संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ७ सप्टेंबर, २००७ अन्वये राज्य मुख्य माहिती आयुक्तांच्या सेवेच्या अटी व शर्ती विहित करण्यात आलेल्या आहेत.

३. उपरोक्त बाबी विचारात घेता राज्य मुख्य माहिती आयुक्त यांच्या सेवेच्या अटी व शर्तीमध्ये व सेवा निवृत्ती विषयक लाभामध्ये सुधारणा करणे आवश्यक आहे. या अनुषंगाने राज्य मुख्य माहिती आयुक्त यांच्या सेवानिवृत्तीविषयक लाभांमध्ये, शासनाने यापूर्वी निर्गमित केलेल्या संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग दिनांक ०८/२/२०११ मध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

राज्य मुख्य माहिती आयुक्त यांच्या सेवेच्या अटी व शर्तीमध्ये व सेवा निवृत्ती विषयक लाभांमध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

| **बाब** | **असुधारित निवृत्ती वेतन व भत्ते** | **सुधारित निवृत्ती वेतन व भत्ते** | **सुधारणा अंमलात आल्याचा दिनांक** |
|---|---|---|---|
| अतिरिक्त निवृत्ती वेतन | सेवेच्या प्रत्येक पूर्ण वर्ष कालावधीसाठी रु.१६,०२०/- | सेवेच्या प्रत्येक पूर्ण वर्ष कालावधीसाठी रु.४५,०१६/- | ०१.०१.२०१६ |
| निवृत्ती वेतन व अतिरिक्त निवृत्ती वेतनाची एकूण कमाल मर्यादा | रु.५,४०,०००/- प्रतिवर्ष | रु.१५,००,००० | ०१.०१.२०१६ |
| अतिरिक्त ग्रॅच्युटी (सेवा उपदान) | -- | सेवेच्या प्रत्येक पूर्ण सहा महिने कालावधीसाठी दहा दिवसाचे वेतन | ०१.०१.२०१६ |
| ग्रॅच्युटी (सेवा उपदान) व अतिरिक्त ग्रॅच्युटीची एकूण कमाल मर्यादा | -- | रु.२०,००,००० | ०१.०१.२०१६ |

२. सदर सुधारणा पुढील सुधारणा होईपर्यंत दिनांक १.१.२०१६ नंतर सेवानिवृत्त झालेले राज्य मुख्य माहिती आयुक्त यांना लागू होतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०११८१२१६१६४५०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Chhaya Kiran Wadte

Digitally signed by Chhaya Kiran Wadte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f311bd8712a7b94b3b73d0e88ad01cf3a49c098bcd5f62e16e7135388baa523c, serialNumber=5bac345149360802f8cd3e4ab4ec174f2fec1bff420e81931e638ee6cdfcc12d, cn=Chhaya Kiran Wadte
Date: 2019.01.18 12:21:01 +05'30'

**( छा.कि.वडते )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
४) राज्य मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई

५) सर्व राज्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई

६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) - १ महाराष्ट्र, मुंबई

७) महालेखापाल (लेखा परिक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई

८) सचिव, राज्य माहिती आयोग, मुंबई

९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१०) निवड नस्ती, कार्या-सहा.